**सहायक भाषा संचालक (अनुवाद व शब्दावली) या संवर्गात तदर्थ पदोन्नती- श्री.चं.वि.पारकर.**

# महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

शासन आदेश क्रमांकः भासंप-२०१८/प्र.क्र.१०६/आस्था-२,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: १२ नोव्हेंबर,२०१८.

**वाचा :** मराठी भाषा विभाग शासन आदेश क्र. भासंप-२०१५/प्र.क्र.६३/आस्था-२, दि. १८.०६.२०१६.

## <u>शासन आदेश</u>

भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील श्री.चं.वि.पारकर यांना वर उल्लेखित दि.१८.०६.२०१६ च्या आदेशाद्वारे सरळसेवेच्या कोटयातील पदावर ११ महिने किंवा सदर पदाकरिता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून उमेदवार उपलब्ध होणे यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीकरीता सहायक भाषा संचालक (अनुवाद व शब्दावली) या पदावर तदर्थ स्वरुपात पदोन्नती देण्यात आली होती. सदर कालावधी दि.१७.०५.२०१७ अखेर संपुष्टात आला आहे. त्यामुळे दि.१८.०५.२०१७ रोजी तांत्रिक खंड देऊन दि.१९.०५.२०१७ ते दि.१८.०४.२०१८ या कालावधीकरिता आणि दि.१९.०४.२०१८ रोजी तांत्रिक खंड देऊन दि.२०.०४.२०१८ ते दि.०९.११.२०१८ या कालावधीकरीता श्री. चं.वि.पारकर यांना सहायक भाषा संचालक (अनुवाद व शब्दावली) या सरळसेवेच्या कोटयातील पदावर खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे.

१) त्यांचे विरुध्द कोणत्याही दोषारोपाखाली विभागीय चौकशी प्रस्तावित किंवा प्रलंबित नाही.

२) सदरहू पदोन्नती ही नामनिर्देशनाच्या कोटयातील पदावर देण्यात येत असल्यामुळे ती तदर्थ (Adhoc) स्वरुपाची आहे.

३) या कालावधीत त्यांची पदस्थापना विभागीय सहायक भाषा संचालक, औरंगाबाद या पदावर राहील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८१११२१३०६३९४१३३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

M. P. Kudtarkar
Digitally signed by M. P. Kudtarkar
Date: 2018.11.12 15:48:43 +05'30'

(मं.प.कुडतरकर)
कार्यासन अधिकारी

**प्रति,**

१) श्री.चं.वि.पारकर, सहायक भाषा संचालक (अनुवाद व शब्दावली)
द्वारा भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे मार्फत.

२) भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, प्रशासकीय इमारत, ५ वा मजला,
डॉ.आंबेडकर उद्यानाजवळ, शासकीय वसाहत, वांद्रे (पूर्व), मुंबई - ४०० ०५१.

३) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई. (पत्राने)

४) महालेखापाल (लेखा परीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १, मुंबई.

५) महालेखाकार (लेखा परीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.

६) उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग / का.१२, मंत्रालय, मुंबई.

७) कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, औरंगाबाद.

८) निवड नस्ती.